संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेमधील अधिष्ठाता यांना शासकीय कामकाजासाठी चारचाकी वाहन भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : वाहन-०२२५/प्र.क्र.६६/प्रशा-२**

गो. ते. संकुल इमारत, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख : ०७ एप्रिल, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
२) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक : भाखंस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : वाहन- २०१७/ प्र. क्र. ४१/ १७/ विनियम, दिनांक २८.०७.२०२०.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : शापसे-३४२२/प्र.क्र.७८/का.३१, दिनांक ०१.०६.२०२३.
५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष यांचे पत्र क्र. संवैशिवस/ म/ शादंमरुना/ वाहन/ १३८०/ २०२५, दिनांक १४.०२.२०२५.
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : वाहन-२१२१/प्र.क्र.८१/का.३१ (शापसे), दिनांक १४.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. ५ च्या पत्रान्वये संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेमधील अधिष्ठाता यांना शासकीय कामकाजासाठी चारचाकी वाहन भाडेतत्वावर घेण्यास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, मुंबई यांनी शासनास सादर केला आहे.

सदर संस्थेकडे कार्यालयीन कामकाजाकरीता वाहन उपलब्ध नाही. यास्तव सदर संस्थेमधील अधिष्ठाता यांना त्यांच्या कार्यालयीन कामकाजाकरीता चारचाकी वाहन भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेमधील अधिष्ठाता यांना दैनंदिन शासकीय कामकाजाकरीता संदर्भ क्र. ६ वरील सामान्य

प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १४.०२.२०२३ अन्वये निश्चित पुरवठादार मे. महेश ट्रॅव्हल्स, नागपूर यांच्याकडून सदर शासन निर्णयासोबतच्या "विवरणपत्र-अ" मध्ये नमुद अ.क्र. १ ते ४ या वाहनांपैकी कोणतेही एक वाहन निश्चित करण्यात आलेल्या दर सूचीनुसार भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास व त्यासाठी दरमहा रुपये ५५,०००/- या प्रमाणे एकूण रुपये ६,६०,०००/- (करांशिवाय) एवढ्या वार्षिक खर्चास तसेच त्यावरील अनुज्ञेय कर अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर वाहनाच्या भाड्यापोटी येणारा वार्षीक खर्च संबंधित संस्थेच्या लेखाशिर्षाखाली चालू वित्तीय वर्षात (१३) कार्यालयीन खर्च या उद्दिष्टांतर्गत उपलब्ध निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग दोन, अनुक्रमांक-१३, नियम क्र. ६० व ६१ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४०७१५२५०९०५१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2025.04.07 16:26:17 +05'30'

**( म. गि. जोगदंड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, संचालनालय, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
६. मे. महेश ट्रॅव्हल्स, नागपूर.
७. निवडनस्ती (प्रशा-२).